**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१०-२०११**
२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम
१९६ - जिल्हा परिषद / जिल्हास्तरीय पंचायतीस सहाय्य
(००) (०२) पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थांना अनुदान
(२५१५ १६७७) (योजनातंर्गत / दत्तमत्त)
३१ - सहाय्यक अनुदान (मागणी क्रमांक- एल ३)
**पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेअंतर्गत वितरीत करावयाचा निधी (दुसरा हप्ता)**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. व्हीपीएम २६१०/प्र.क्र. १५४ /पंरा-४(२२)
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक- ३१ मार्च, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१/पं.रा.-४ दि. १८ ऑगस्ट,२०१०
२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.व्हीपीएम२६१०/प्र.क्र.१५४/पं.रा.-४ दि.२८ सप्टेंबर,२०१०
३) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१५४/पं.रा.-४ दि.२३ नोव्हेंबर,२०१०
४) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१५४/पं.रा.-४ दि.३ फेब्रुवारी,२०११
५) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१५४/पं.रा.-४ दि.२४ मार्च,२०११
६) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१५४/पं.रा.-४ दि.३१ मार्च,२०११

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीला ५० वर्षे पुर्ण होत असून राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षाच्या निमित्ताने राज्यातील गावांचा शाश्वत विकास घडवून आणण्याकरीता ग्रामविकासाची दिशा ठरविण्याची गरज आहे. शाश्वत ग्रामविकास संकल्पनेत महत्वाचे तत्व असे आहे की, गावात एकीकडे उच्च प्रतिच्या भौतिक सुविधांची निर्मिती करतानाच यासाठी लागणाऱ्या नैसर्गिक साधन संपत्तीचा विनियोग पर्यावरणाचा समतोल राखून कसा करता येईल याचाही प्राथम्याने विचार झाला पाहिजे. दिवसेंदिवस लोकसंख्या वाढत असून नैसर्गिक साधन संपत्तीचा ऱ्हास होत आहे, त्यामुळे Global Warming सारखे अनेक विषय मूळ धरू पाहत आहेत. पर्यावरणाचे संवर्धन, जतन व संरक्षण करून समृध्द व संपन्न गावांची निर्मित करणे ही काळाची गरज आहे.

यासाठी जल, जमीन, हवा, वनस्पती यांचे योग्य व्यवस्थापन करून भौतिक सोयी सुविधांची निर्मिती पर्यावरण संतुलन राखून केल्यास ग्रामस्थांचे जीवनमान / दर्जा सुधारण्यास मदत होईल. पर्यावरणाचे संतुलन केंद्रस्थानी ठेवून ग्रामपंचायतींना रोपवाटिका व वृक्षसंवर्धन, गावातील सांडपाण्याचे व्यवस्थापन, जलनि:स्सारण गटारे, रस्त्यावरील दिवाबत्ती- सौर पथदिवे, अपारंपारिक उर्जा विकास व वापर, दहन-दफन भूमी बांधकाम व त्यासाठी आवश्यक इतर सोईसुविधा पुरविणे, स्मृती उद्याने, राजीव गांधी भारत निर्माण सुविधा केंद्र इत्यादीकरीता निधी जिल्हा स्तरावरुन ग्रामपंचायतींना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात रुपये १४९.४० कोटी इतक्या अर्थसंकल्पीत रकमेपैकी उपरोक्त नमूद बाबीसाठी यापूर्वी रुपये १३४.४६ कोटी (रुपये एकशे चौतीस कोटी शेचाळीस लाख फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध झालेली होती. आता उर्वरित रुपये १४.९४ कोटी इतकी रक्कम व सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात यशवंत समृध्दी ग्राम योजनेचा रुपये ४.५० कोटी इतका निधी पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेकडे वर्ग करण्यात आल्याने एकूण रुपये १९.४४ कोटी इतकी रक्कम पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेकरीता प्राप्त झालेली आहे. सदरचा रुपये १९.४४ कोटी निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना दिनांक ३१ मार्च,२०११ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. या निधीबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदरहू निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे यांनी पुढील आदेश होईपर्यंत त्यांचे नियंत्रणाखाली ठेवणेबाबत निदेशित करण्यात आले होते. या आदेशान्वये सदरचा निधी आता मुख्य कार्यकारी अधिकरी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व यांना वितरीत करावा. या निधीबाबत ते नियंत्रक अधिकारी राहतील.

३. संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २४ मार्च,२०११ अन्वये वितरीत करण्यात आलेल्या विवरणपत्रातील जिल्हा परिषद, सोलापूर यांना पात्र २५२ ग्रामपंचायतीसाठी रुपये ७.९५ कोटी इतका निधी दर्शविण्यात आलेला होता. आता जिल्हा परिषद, सोलापूर यांनी २५२ पात्र ग्रामपंचायतीसाठी रुपये ८.०० कोटी इतका निधी लागणार असल्याबध्दल कळविले आहे. तसेच जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना पात्र ९९८ ग्रामपंचायतीसाठी रुपये ३४.३८ कोटी इतका निधी दर्शविण्यात आलेला होता. आता जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी ९९८ पात्र ग्रामपंचायतीसाठी रुपये ३४.४४ कोटी इतका निधी लागणार असल्याबध्दल कळविले आहे. तसेच जिल्हा परिषद, परभणी यांना पात्र ६१ ग्रामपंचायतीसाठी रुपये १.५५ कोटी इतका निधी दर्शविण्यात आलेला होता. आता जिल्हा परिषद, परभणी यांनी ६४ पात्र ग्रामपंचायतीसाठी रुपये १.५५ कोटी इतका निधी लागणार असल्याबध्दल कळविले आहे.

जिल्हा परिषद, उस्मनाबाद यांना पात्र ९२ ग्रामपंचायतीसाठी रुपये ३.३२ कोटी इतका निधी दर्शविण्यात आलेला होता. आता जिल्हा परिषद, उस्मनाबाद यांनी ६७ पात्र ग्रामपंचायतीसाठी रुपये २.३९ कोटी इतका निधी लागणार असल्याबध्दल कळविले आहे. त्यानुसार या शासननिर्णयात सुधारणा करण्यात येत आहे. सुधारित निधीप्रमाणे आता संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना निधीचे वितरण करण्यात यावे.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांनी या योजनेकरीता झालेल्या / होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाएवढा खर्च "२५१५" - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद / जिल्हास्तरीय पंचायतीस सहाय्य, (००) (०२) पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थांना अनुदान (२५१५ १६७७) (योजनातंर्गत / दत्तमत्त) ३१ - सहाय्यक अनुदान (मागणी क्रमांक- एल ३) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाने अर्थसकल्पीय वितरीण प्रणालीवर (Budget Distribution System ) या विभागास उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.: 201104191433180001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( म.सो.खंडारे )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई -४०० ००१ वर नमूद केल्याप्रमाणे तीन प्रतीत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी.( ३ प्रती )

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ००१
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ , नागपूर .
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
४)अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य (अराप/रालेवि-१), मुंबई.

५) विभागीय आयुक्त (सर्व )
६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
९) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत )
१०) कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारणविभाग (वित्त -१, वित्त- ७, वित्त -८)
११) कक्ष अधिकारी (रोखशाखा) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.३२.
१२) वित्त विभाग (अर्थसंकल्प १७ / व्यय१५)मंत्रालय, मुंबई.३२.
१३) निवडनस्ती ,पंरा -४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

**विवरणपत्र**

**शासन निर्णय क्र.व्हीपीएम २६१०/ प्र.क्र.१५४ /पंरा-४, दिनांक ३१ मार्च, २०११ सोबतचे विवरणपत्र, "२५१५" - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद / जिल्हास्तरीय पंचायतीस सहाय्य, (००) (०२)**

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | एकुण ग्रामपंचायतीची संख्या | जिल्हा स्तरीय समितीने शिफारस केलेल्या पात्र ग्रा.पं.संख्या | विभागीय समिती तपासणी नंतर अंतीम पात्र ग्रा.पं.संख्या | पात्र ग्रामपंचायतीस लोकसंख्या निहाय लागणारा निधी (रुपये कोटीत) | पहिल्या टप्प्यात वितरीत केलेला निधी (रुपये कोटीत) | दुसऱ्या टप्प्यात वितरीत करावयाचा निधी (रुपये हजारात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ठाणे | ९२४ | ६९३ | ५३९ | १९.०३ | ६.४५८८ | ९४६८.०० |
| २ | रायगड | ८२१ | ७५१ | ७३३ | २४.४३ | ८.२९१५ | १२१५५.०० |
| ३ | रत्नागिरी | ८५१ | ७६६ | ७५१ | २४.०४ | ८.१५९२ | ११९६१.०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ४३१ | ४३० | ४३० | १३.५२ | ४.५८८७ | ६७२७.०० |
| ५ | नाशिक | १३८२ | ४५५ | ४५३ | १५.३६ | ५.२१३२ | ७६४२.०० |
| ६ | धुळे | ५५१ | २०० | १९९ | ६.७२ | २.२८०८ | ३३४४.०० |
| ७ | नंदुरबार | ५०१ | १३६ | १३३ | ३.५४ | १.२०१५ | १७६१.०० |
| ८ | जळगांव | ११५१ | ४८४ | ४७८ | १५.५८ | ५.२८७९ | ७७५२.०० |
| ९ | अहमदनगर | १३१५ | ८२४ | ८१२ | २८.६७ | ९.७३०६ | १४२६५.०० |
| १० | पुणे | १४०७ | ९५१ | ९५० | ३०.९३ | १०.४९८ | १५३८९.०० |
| ११ | सातारा | १५०९ | १३८२ | १३७६ | ३९.३८ | १३.३६६ | १९५९४.०० |
| १२ | सांगली | ७०५ | ५३६ | ५३६ | १८.४९ | ६.२७५५ | ९२००.०० |
| १३ | सोलापूर | १०२८ | २५२ | २५२ | ८ | २.६९८२ | ३९५६.०० |
| १४ | कोल्हापूर | १०२८ | १००२ | ९९८ | ३४.४४ | ११.६६९ | १७१०६.०० |
| १५ | औरंगाबाद | ८५८ | १०२ | १०० | ३.२७ | १.१०९८ | १६२७.०० |
| १६ | जालना | ७८१ | १९४ | १८३ | ५.७४ | १.९४८२ | २८५६.०० |
| १७ | परभणी | ७०४ | ६८ | ६४ | १.५५ | ०.५२६१ | ७७१.०० |
| १८ | हिंगोली | ५६५ | २५२ | २०१ | ५.३२ | १.८०५६ | २६४७.०० |
| १९ | बीड | १०१९ | ५९ | ४१ | १.०१ | ०.३४२८ | ५०३.०० |
| २० | नांदेड | १३११ | २६६ | २५६ | ७.०३ | २.३८६ | ३४९८.०० |
| २१ | उस्मानाबाद | ६२१ | १०१ | ६७ | २.३९ | १.१२६८ | १६५२.०० |
| २२ | लातूर | ७८७ | ११२ | १०७ | २.८ | ०.९५०३ | १३९३.०० |
| २३ | अमरावती | ८४३ | १३१ | १३१ | ३.७६ | १.२७६१ | १८७१.०० |
| २४ | अकोला | ५४२ | १५ | १४ | ०.३७ | ०.१२५६ | १८४.०० |
| २५ | यवतमाळ | १२०८ | ८० | ८० | २.१२ | ०.७१९५ | १०५५.०० |
| २६ | बुलडाणा | ८६७ | २१ | २१ | ०.६ | ०.२०३६ | २९९.०० |
| २७ | वाशिम | ४९३ | ४४ | १४ | ०.४१ | ०.१३९२ | २०४.०० |
| २८ | नागपूर | ७७६ | ६११ | ६११ | १९.२८ | ६.५४३६ | ९५९३.०० |
| २९ | वर्धा | ५१७ | ३९२ | ३९२ | १२.०४ | ४.०८६४ | ५९९१.०० |
| ३० | भंडारा | ५४१ | ४८८ | ४८८ | १५.१२ | ५.१३१७ | ७५२३.०० |
| ३१ | गोंदिया | ५५६ | ३५० | ३५० | ११.७४ | ३.९८४६ | ५८४१.०० |
| ३२ | चंद्रपूर | ८४७ | ३०७ | ३०१ | ८.९१ | ३.०२४१ | ४४३३.०० |
| ३३ | गडचिरोली | ४६७ | १३२ | १३२ | ४.३ | १.४५९४ | २१३९.०० |
| | **एकूण** | **२७९०७** | **१२५८७** | **१२११३** | **३८१.८९** | **१३२.६१** | **१९४४००.००** |

(म.सो.खंडारे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन